**जिल्हा परिषदेतील जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३ (विद्युत व यांत्रिक) संवर्गातील कनिष्ठ अभियंता दिनांक ०१.०१.२०२३ व दिनांक ०१.०१.२०२४ रोजीच्या एकत्रित राज्यस्तरीय अंतिम ज्येष्ठतासूचीचे शुध्दीपत्रक.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः जिपआ-२०२५/प्र.क्र.४८/आस्था-४**
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४०० ००१.
दिनांक:- १० मार्च, २०२५

**संदर्भ:-** १) शासन परिपत्रक क्रमांकः जिपआ-२०२४/प्र.क्र.४१/आस्था-४, दिनांक २४ जूलै, २०२४
२) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई यांचे कार्यालयाकडील पत्र क्र.विकास/अपिल/पाणीपुरवठा/प्र.क्र.३७१९४१, दि.३१.०७.२०२४.

**शासन शुध्दीपत्रक :-**

जिल्हा परिषदेतील जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३ (विद्युत व यांत्रिकी) या संवर्गातील कनिष्ठ अभियंता दिनांक ०१.०१.२०२३ व दि.०१.०१.२०२४ रोजीची एकत्रित सुधारित अंतिम ज्येष्ठता यादी संदर्भ क्र. १ च्या परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात आली आहे.

२. उप आयुक्त (आस्थापना), कोकण विभाग यांनी संदर्भ क्रमांक २ येथील दि.३१.०७.२०२४ रोजीच्या पत्रान्वये श्री.के.पी.खलाणे, कनिष्ठ अभियंता यांचे नाव जिल्हा परिषदेतील जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३ (विद्युत व यांत्रिकी) या संवर्गातील कनिष्ठ अभियंता दि.०१.०१.२०२३ व दि.०१.०१.२०२४ एकत्रित अंतिम ज्येष्ठता यादीमध्ये समाविष्ठ करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

३. श्री. के.पी.खलाणे, कनिष्ठ अभियंता (यांत्रिकी) यांचे नाव दि.०१.०१.२०२० ते ०१.०१.२०२२ च्या दिनांक ०९.१०.२०२३ रोजी प्रसिध्द करण्यात आलेल्या एकत्रित ज्येष्ठता यादीमध्ये समाविष्ट होते. सदर ज्येष्ठता यादीमध्ये श्री. खलाणे यांचा जन्मदिनांक १३.०२.१९६१ नमूद करुन सेवानिवृत्त दर्शविण्यात आले होते. सबब दि.०१.०१.२०२३ व ०१.०१.२०२४ च्या एकत्रित ज्येष्ठता यादीमधून सेवानिवृत्त दर्शविण्यात आलेले कनिष्ठ अभियंता यांचे नाव वगळण्यात आले. परंतु संदर्भ क्र.२ येथील प्रस्तावामध्ये नमूद केल्यानुसार श्री. खलाणे यांचा जन्मदिनांक १३.०२.१९६९ असून ते सध्या जि.प. ठाणे येथे कार्यरत आहेत. सबब श्री. खलाणे यांचे नाव दि. ०१.०१.२०२३ व ०१.०१.२०२४ च्या ज्येष्ठता यादीमध्ये नव्याने समाविष्ट करण्यात येत आहे.

४. संदर्भ क्र.१ येथील दि.०१.०१.२०२३ व दि.०१.०१.२०२४ च्या अंतिम ज्येष्ठता यादीमध्ये सुधारणा करुन या शुद्धीपत्रकासोबत जोडलेल्या प्रपत्रात नमूद केल्याप्रमाणे **श्री. के.पी.खलाणे, कनिष्ठ अभियंता** यांचे नाव **अनुक्रमांक १७ अ (भाग-२) (पदविकाधारक) यांत्रिकी** येथे निश्चित करण्यात येत आहे.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०२५०३१०१५०७०४७३२० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DIPALI SUMESH PAWAR

Digitally signed by DIPALI SUMESH PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=49f697a7aeb1f23ad74b32feb0d474fecb420d05989435ae36b986cc066a5eb5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7F5419EF2C485800F9EA494C51A1B6FF77F8BB09799E15112995C5686B97A2EE, cn=DIPALI SUMESH PAWAR
Date: 2025.03.10 15:08:06 +05'30'

**( दिपाली पवार )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**सोबत : शुध्दीपत्रकाचे सहपत्र**

प्रत,

१) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जी.टी.रुग्णालय, क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-००१.

२) विभागीय आयुक्त, कोकण विभाग.

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे, यांनी सदर ज्येष्ठता यादी संबंधितांच्या निदर्शनांस आणून देण्याच्या विनंतीसह अग्रेषित.

४) निवड नस्ती.

## जिल्हा परिषदेतील जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३ (विद्युत व यांत्रिकी) संवर्गातील कनिष्ठ अभियंता यांची दिनांक ०१.०१.२०२३ व दि.०१.०१.२०२४ रोजीच्या एकत्रित अंतिम ज्येष्ठतासूचीच्या दि. १०.०३.२०२५ रोजीच्या शुध्दीपत्रकाचे सहपत्र

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नाव | जिल्हा परिषद | बांधकाम/ पाणी पुरवठा/ सिंचन यापैकी कोणत्या विभागात कार्यरत आहेत. | जन्म दिनांक | शैक्षणिक पात्रता | कनिष्ठ अभियंता पदावरील नियमित नियुक्तीचा दिनांक | जात प्रवर्ग | व्यावसायिक अर्हता परीक्षा उत्तीर्ण/सुट | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| भाग-२ (पदविकाधारक) यांत्रिकी | | | | | | | | | |
| १७ अ | श्री. के.पी. खलाणे | ठाणे | पाणीपुरवठा | १३.०२.१९६९ | डिप्लोमा इन इलेक्ट्रीकल पॉवर सिस्टीम | ०२.०१.२०१९ | इमाव | सूट | |